**भारतीय संविधानाच्या अनुच्छेद २७५(१) अंतर्गत**
**सन २००८-०९ या वर्षात समर्पित झालेला निधी**
**सन २००९-१० मध्ये खर्च करण्यास मंजूरी.......**

**महाराष्ट्र शासन**
आदिवासी विकास विभाग,
शासन निर्णय क्रमांक:शाआशा-२००९/प्र.क्र.२४४/का-१७,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ९ फेब्रुवारी,२०१०

वाचा :- १) शासन निर्णय,आदिवासी विकास विभाग,क्रमांक:केंद्रीय-२००९/प्र.क्र.५८/का-१७, दिनांक: २७ फेब्रुवारी,२००९.
२) शासन निर्णय,आदिवासी विकास विभाग,क्रमांक:जीओआय-२००८/प्र.क्र.०९/ का-११, दिनांक ४ जून,२००८.
३) शासन निर्णय,आदिवासी विकास विभाग,क्रमांक:केंद्रीय-२००९/प्र.क्र.८३/का-१७, दिनांक: २६-३-२००९.
४) शासन निर्णय,आदिवासी विकास विभाग,क्रमांक:बीयुडी-२००९/प्र.क्र.६५/का-६, दिनांक: ११-१-२०१०.
५) आयुक्त, आदिवासी विकास,महाराष्ट्र राज्य, नाशिक यांचे पत्र क्रमांक:केंद्रीय- २००९/प्र.क्र. ५६/ का-८(४), दिनांक २७-१-२०१०

**प्रस्तावना :-** भारतीय संविधानाच्या अनुच्छेद २७५(१) अंतर्गत सन २००८-०९ या वर्षात योजनांसाठी मंजूर करण्यात आलेला रु. १६८.८८ लक्ष एवढा निधी क्षेत्रिय कार्यालयाकडून आहरीत न झाल्याने खालीलप्रमाणे समर्पित झाल्याचे शासनाच्या निदर्शनास आले आहे.

**(रुपये लाखात)**

| अ. क्र. | योजनेचे नांव | उपलब्ध करुन दिलेला निधी रु. | आहरीत निधी रु. | समर्पित निधी रु. |
|---|---|---|---|---|
| १ | शासकीय आश्रमशाळा क्रिडांगणाचा विकास करणे व जिमखान्याचे बांधकाम करणे | ६.०० | ५.८६ | ०.१४ |
| २ | आदिवासी शेतक-यांना मल्टिक्रॉप थ्रेशर मशिनचा पुरवठा करणे | १.०० | ०.०० | १.०० |
| ३ | आदिवासी शेतक-यांना तुषार जलसिंचन संच पुरविणे | १.८६ | ०.०० | १.८६ |
| ४ | शासकीय आश्रमशाळेच्या धर्तीवर मुलांचे / मुलींचे वसतिगृहाच्या इमारतीचे बांधकाम करणे. | १५.०० | ८.०० | ७.०० |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| ५ | इंग्रजी माध्यमाच्या शाळेकरीता इमारत बांधकाम करणे. | २०८.०० | १०४.०० | १०४.०० |
| ६ | इकोटेक प्रकल्प उभारणे. | १७३.६८ | ११८.९७ | ५४.७१ |
| | | ५४.७१ | ५४.७१ | -- |
| ७ | अनुसूचित जमाती व इतर पारंपारीक वन निवासी (वन हक्क मान्यता) अधिनियम, २००६ ची अंमलबजावणी | ३७५.४७ | ३७५.३० | ०.१७ |
| | **एकूण :-** | | | **१६८.८८** |

यापैकी इकोटेक प्रकल्प उभारणीसाठी रु. ५४.७१ लक्ष हा निधी सन २००७-०८ मध्ये योजनांच्या सनियंत्रणासाठी पुणे येथे स्वतंत्र कक्ष उभारणे (रु.५.७९ लक्ष) व वनहक्क कायदा प्रशिक्षण (रु. ४८.९२ लक्ष ) असा एकूण ५४.७१ लक्ष एवढा निधी या विभागाच्या शासन निर्णय,आदिवासी विकास विभाग,क्रमांक:जीओआय-२००८/प्र.क्र.०९/का-११, दिनांक ४ जून, २००८ अन्वये सन २००८-०९ मध्ये उपलब्ध करुन दिलेला होता तो याच दोन योजनांसाठी नंतरच्या वर्षात उपलब्ध करणे केंद्र शासनाच्या नियमाप्रमाणे आवश्यक आहे. तथापि त्या योजनांना चालू वर्षात (सन २००९-१०)निधी उपलब्ध करुन देण्याची आवश्यकता नसल्याने ती योजना वगळून इतर रु.११४.०० लक्ष रकमेच्या योजनांवर सन २००९-१० मध्ये खर्च करण्यास मंजूरी देण्यात येत आहे. सन २००८-०९ मध्ये या योजनांची सर्मपित झालेली रु. ०.१७ लक्ष रक्कम सुध्दा आवश्यक नसल्याने सन २००९-१० मध्ये उपलब्ध करण्याची गरज नाही. केंद्र शासनाकडून प्राप्त झालेले ते अनुदान ज्या योजनांसाठी मंजूर करण्यात येते त्या योजनांसाठी पूर्णपणे खर्च करणे बंधनकारक असल्याने भारतीय संविधानाच्या अनुच्छेद २७५(१) अंतर्गत सन २००८-०९ मध्ये सर्मपित झालेला रु.११४.०० लक्ष निधी सन २००९-१० मध्ये उपलब्ध करुन खर्च करण्यास परवानगी देण्याचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-** शासन आता या निर्णयाव्दारे खाली दर्शविल्याप्रमाणे संबंधीत योजनांसाठी भारतीय संविधानाच्या अनुच्छेद २७५(१) अंतर्गत सन २००८-०९ मध्ये सर्मपित झाल्यामुळे खर्च न झालेला रु.११४.०० लक्ष (रुपये एक कोटी चौदा लक्ष फक्त) एवढा निधी सन २००९-१० मध्ये खर्च करण्यास आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक यांना मंजूरी देत आहे.

**(रुपये लाखात)**

| अ.क्र. | योजनेचे नांव | खर्चास मंजूरी देण्यात आलेला निधी |
|---|---|---|
| १ | शासकीय आश्रमशाळा क्रिडांगणाचा विकास करणे व जिमखान्याचे बांधकाम करणे | ०.१४ |
| २ | आदिवासी शेतक-यांना मल्टिक्रॉप थ्रेशर मशिनचा पुरवठा करणे. | १.०० |
| ३ | आदिवासी शेतक-यांना तुषार जलसिंचन संच पुरविणे. | १.८६ |

| | | |
|---|---|---|
| ४ | शासकीय आश्रमशाळेच्या धर्तीवर मुलांचे / मुलींचे वर्सतिगृहाच्या इमारतीचे बांधकाम करणे. | ७.०० |
| ५ | इंग्रजी माध्यमाच्या शाळेकरीता इमारत बांधकाम करणे. | १०४.०० |
| एकूण रुपये :- | | ११४.०० |

२. प्रकरणाधीन खर्च मागणी क्रमांक:टी-५, मुख्यलेखाशीर्ष "२२२५,अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती व इतर मागासवर्गीयांचे कल्याण - पंचवावार्षिक योजनांतर्गत योजना -०२ - अनुसूचित जमातीचे कल्याण - ७९६ -जनजाती क्षेत्र उपयोजना (०१) जनजाती क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना (०१) (४३) भारतीय संविधानाच्या अनुच्छेद २७५(१) अन्वये केंद्रीय सहाय्य (२२२५ २४२४) -३३-अर्थ सहाय्य " या अर्थ लेखाशिर्षाखाली सन २००९-१० च्या अर्थसंकल्पीय तरतूदीतून करण्यात यावा.

३. हा शासन निर्णय राज्य शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्र. २०१००२१११५२३०३००१ असा आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

**( र. प्र. आटे )**
**अवर सचिव**

प्रति,
आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक (५ प्रती)
आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे.
सर्व अपर आयुक्त, आदिवासी विकास (प्रत्येकी २ प्रती)
सर्व प्रकल्प अधिकारी,एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प,
महालेखापाल (लेखा परिक्षा) महाराष्ट्र १/२, मुंबई / नागपूर
महालेखापाल (लेखा परिक्षा) महाराष्ट्र १/२, मुंबई / नागपूर
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
मा. प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग यांचे स्वीय सहाय्यक.
सह सचिव (श्री. सिंह) आदिवासी विकास यांचे स्वीय सहाय्यक.
कक्ष अधिकारी (का-६) आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
संगणक समन्वयक, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
निवड नस्ती (का-१७) आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई